जिल्हा पालक सचिवांमार्फत
लोकशाही दिनाची अंमलबजावणी.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक :- मंलोदि-२००५/प्र.क्र.२/०५/१८-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २७ सप्टेंबर, २००५.

वाचा : - १) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्रमांक : प्रसुधा-१०९९/प्र.क्र.-२३/९९/१८-अ, दिनांक २९-१२-१९९९.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांक : प्रसुधा-१०९९/प्र.क्र.-३५/९९/१८-अ, दिनांक २०-१-२०००.
३) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्रमांक : प्रसुधा-१००१/प्र.क्र.-७०/२००१/१८-अ, दिनांक १०-१२-२००१.
४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्रमांक : प्रसुधा-१०००/प्र.क्र.७०/२००१ (भाग-२)/१८-अ, दिनांक १२-६-२००२.

**शासन परिपत्रक :-**

सर्व जिल्हयांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी प्रत्येक महिन्याचा पहिला सोमवार, "लोकशाही दिन" म्हणून पाळण्याचा निर्णय दि.२९.१२.१९९९ चे शासन परिपत्रक आणि दि.२०.१.२००० च्या शासन निर्णयान्वये शासनाने घेतलेला आहे. तसेच, मंत्रालयात प्रत्येक महिन्याच्या पहिल्या सोमवारी, "मंत्रालय लोकशाही दिन" दि.१०.१२.२००१ च्या परिपत्रकान्वये पाळण्यात येत आहे.

लोकशाही दिनाच्या कामाचा आढावा घेणे व इतर अनुषंगिक कामाकरिता दि. २०.१.२००० च्या शासन निर्णयान्वये पालक सचिवांची जबाबदारी व कर्तव्ये काय आहेत याबाबत सविस्तर सूचना देण्यात आल्या आहेत. सदर सूचनांमध्ये खालीलप्रमाणे अंशतः बदल करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) पालक सचिवांनी मंत्रालय लोकशाही दिनी प्राप्त झालेल्या निवेदनांचा आढावा घेण्यासाठी किमान दोन महिन्यातून एकदा त्यांना नेमून दिलेल्या जिल्हयास भेट द्यावी व त्याप्रमाणे अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयातील परिशिष्ट १ मधील नमुन्यात जिल्हा भेटीचा अहवाल पालक सचिवांनी सादर करावा.

(२) भेटी दरम्यान जिल्हा लोकशाही दिनाच्या दिवशी सर्व अधिकारी हजर राहतात किंवा कसे, तसेच, जनतेच्या तक्रारींचे निरसन त्वरेने करण्यात येते काय याची तपासणी करावी. आवश्यक वाटल्यास, पालक सचिवांनी लोकशाही दिनी हजर राहण्यास हरकत नाही.

(३) जिल्हास्तरावर पालक सचिवांना आवश्यक वाटल्यास, संबंधीत (जिल्हास्तरीय) अधिकाऱ्यांच्या बैठका आयोजित करता येतील.

(४ पालक सचिवांनी जिल्हास्तरीय ज्वलंत व महत्वाच्या प्रश्नां ा सोडवणूक होण्याच्या दृष्टीने विविध मंत्रालयीन विभागांकडे पाठपुरावा करावा.

(५) पालक सचिवांनी लोकशाही दिनी प्राप्त निवेदनावरील अहवालाव्यतिरिक्त इतर विभागांशी संबंधीत असलेल्या कार्यवाहीचा अहवाल तो ज्या विभागाशी संबंधीत असेल, त्या विभागाच्या प्रमुखांना पाठविण्याची दक्षता घ्यावी.

पालक सचिवांनी याबाबतची कार्यवाही व्यक्तीशः करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल माझ्याकडे सादर करावा. लोकशाही दिनी प्राप्त झालेली निवेदने प्रलंबित राहाणार नाहीत आणि निवेनदन धारक / अर्जदार यांना मंत्रालयात "मंत्रालय लोकशाही दिनी" त्याच - त्याच तक्रारी संदर्भात वारंवार येण्याची गरज भासणार नाही, याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा. मे. प्रेमकुमार)
मुख्य सचिव.

प्रति,
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व संबंधित जिल्हा पालक सचिव,
सर्व विभागीय आयुक्त तथा संबधित पालक सचिव,
सर्व जिल्हाधिकारी.

---